महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीकडून २०२५-२६ या आर्थिक वर्षात राबविण्यात येणा-या विविध योजनांच्या खर्चासाठी (कार्यक्रमांतर्गत) प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : उसाअ-२०२५/प्र.क्र.०६/का-४**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक: १९ जून, २०२५**

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : इयुए-१०७५/एलजेजे, दि.१६.४.१९७५
२) अल्पसंख्याक विकास विभाग , शासन निर्णय क्रमांक : उसाअ-२०१६/प्र.क्र.६(सुधा-१)/का-४, दि.५.१०.२०१६
३) शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि.०७.०४.२०२५

**प्रस्तावना:-**

राज्यात उर्दू भाषेचा विकास, संवर्धन, प्रगती तसेच उर्दू व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारिक आदान प्रदान होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीची स्थापना संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे.

संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये उर्दू साहित्य अकादमी मार्फत राबविण्यात येणा-या योजनांचे पुनर्विलोकन करण्यात आलेले असून, सदर योजनांची पूर्ण क्षमतेने अंमलबजावणी करण्याकरिता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी माहे एप्रिल, २०२५ ते डिसेंबर, २०२५ या ०९ महिन्यांकरिता अर्थसंकल्पित निधीच्या ६० टक्केच्या मर्यादेत रुपये १,१९,००,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी एकोणीस लाख फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक २ अन्वये शासनाकडून निश्चित करण्यात आलेल्या योजनांपैकी महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीकडून राबविण्यात येणाऱ्या खालील विविध ०९ योजना त्यापुढे दर्शविलेल्या खर्चाच्या मर्यादेत तसेच आर्थिक वर्ष सन २०२५-२६ च्या प्रथम नऊमाहिकरिता (डिसेंबर, २०२५ अखेर) अर्थसंकल्पित रकमेच्या ६० टक्केच्या मर्यादेत खालील विविध ०९ योजना राबविण्यासाठी रुपये १,१९,००,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी एकोणीस लाख फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | योजना | खर्च मर्यादा (रुपये) |
|---|---|---|
| १ | इमकान या त्रैमासिकाचे प्रकाशन | ३,००,०००/- |
| २ | उर्दू मुशायरा आयोजित करणे<br>प्रजासत्ताक दिनानिमित्त २६ जानेवारी रोजी गेट वे ऑफ इण्डिया, मुंबई येथे उर्दू मुशायऱ्याचे आयोजन. (एकूण खर्च रु.१५ लाख)<br>याशिवाय, राज्यातील कोणत्याही दोन शहरांध्ये रुपये ३ लाख इतकी कमाल खर्च मर्यादा असलेले मुशायऱ्याचे आयोजन. | २१,००,०००/- |
| ३ | राज्य स्तरीय/ जिल्हा स्तरीय कार्यशाळा/ सेमिनार व उर्दू-मराठी संमेलन आयोजित करणे.<br>राज्यातील कोणत्याही २ शहरामध्ये रुपये ३ लाख इतकी कमाल खर्च मर्यादा असलेले दर्जेदार सेमीनार, साहित्यिक कार्यक्रमांचे आयोजन.<br>त्याचप्रमाणे राज्यातील कोणत्याही एका शहरामध्ये रुपये २ लाख इतकी कमाल खर्च मर्यादा असलेले "मुसन्निफ से मुलाकात (Meet the Writer) कार्यक्रमांचे आयोजन. | ७,००,०००/- |
| ४ | उर्दू भाषा कार्यक्रम आयोजित करण्यासाठी उर्दू शाळा व महाविद्यालयांना अनुदान मंजूर करण्याबाबत. १०० शाळांना प्रत्येकी ५,०००/- आणि ५० महाविद्यालयांना प्रत्येकी १०,०००/- | ४,००,०००/- |
| ५ | उर्दु ग्रंथालयांना नियतकालिके व पुस्तके पुरविणे.<br>एकूण ३५० ग्रंथालयांना प्रत्येकी एकूण १५ पुस्तके व नियतकालिके पुरविणे. | १६,००,०००/- |
| ६ | उर्दू भाषेतून प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांची एकूण ७ वर्गवारीत, प्रत्येक वर्गवारीतून कमाल ३ पुस्तकांना उर्दू अकादमीमार्फत पारितोषिके तसेच प्रत्येक वर्गाकरिता ३ अशा २१ परीक्षिकांना उर्दु अकादमीमार्फत मानधन.<br>(कॅलेंडर वर्ष २०२३ आणि २०२४ प्रती वर्ष खर्च मर्यादा रु.६,००,०००/-) | १२,००,०००/- |
| ७ | उर्दु हस्तलिखिताचे प्रकाशन तसेच मराठी-उर्दु अनुवादकांना एकूण ७ वर्गवारीत पात्र हस्तलिखितांच्या प्रकाशसनासाठी लेखकांना अनुदान तसेच प्रत्येक वर्गाकरिता २ अशा १४ परीक्षिकांना उर्दु अकादमीमार्फत मानधन.<br>(कॅलेंडर वर्ष २०२३ आणि २०२४. प्रती वर्ष खर्च मर्यादा रु.६,००,०००/-) | १२,००,०००/- |
| ८ | उर्दू पत्रकारांसाठी दरवर्षी कार्यशाळेचे आयोजन करणे. | २,००,०००/- |
| ९ | उर्दू भाषेमधील उल्लेखनिय कामगिरी बद्दल पारितोषिके देण्याबाबत.<br>सन २०२१, २०२२ आणि २०२३ या कॅलेंडर वर्षामध्ये उर्दू क्षेत्रामधील उल्लेखनीय कामगिरी तसेच उर्दू भाषेतील नामवंत कवी / लेखक/ विचारवंत यांच्याकडून प्रकाशित उत्कृष्ट पुस्तकांना शोध व निवड समितीच्या शिफारशीनुसार विविध पुरस्कारांचे प्रदान, तसेच त्यासाठी पारितोषिक वितरण समारंभ आयोजित करणे. (एकूण ३ वर्षाचे पुरस्कार. प्रती वर्ष खर्च मर्यादा रु.१४.०० लाख) | ४२,००,०००/- |
| | **(अक्षरी रूपये एक कोटी एकोणीस लाख फक्त)** | **रु.१,१९,००,०००/-** |

२. सदरहू खर्च "मागणीक्र. झेडई-०१, लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम ०१- अल्पसंख्याक सहाय्य (०१) (२३) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या विविध योजनांसाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५ बी ०९४)" या लेखाशिर्षाखालील सन २०२५-२६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक, अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि.०७.०४.२०२५ अन्वये प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०६१९१४४७५९४४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.06.19 14:50:48 +05'30'

**( मिलींद शेणॉय )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :-

१. महालेखापाल (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर,
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. सह सचिव / उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. अवर सचिव / कक्ष अधिकारी, (का-२) / (का-४) आणि (का-७) अल्पसंख्याक विकास विभाग,
६. मंत्रालय, मुंबई-३२
७. अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.
८. निवडनस्ती (महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.)